भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील नियोजन अधिकारी (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांची तात्पुरती ज्येष्ठतासूची
(दि.०१ जाने, २०१९ ते दि.०१ जाने, २०२२)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः आपना-२०१६/प्र.क्र.१४५/पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: ०८ मार्च, २०२२ (२)

**वाचा :**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/१२, दिनांक २१ ऑक्टोबर, २०११
२) **शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१६/प्र.क्र.१४५/ पापु-१५, दिनांक १७ जानेवारी, २०१७
३) **शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१६/प्र.क्र.१४५/ पापु-१५, दिनांक १० सप्टेंबर, २०१८.
४) **शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक** एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दिनांक २१ जून, २०२१.
५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दि. १३ जुलै, २०२१
६) **शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१६/प्र.क्र.१४५/ पापु-१५(१), दिनांक ०८ मार्च, २०२२.

**शासन परिपत्रक :**

सामान्य प्रशासन विभागाने शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांची प्रत्येक वर्षी ज्येष्ठता सूची तयार करणे व प्रसिध्द करणे यासाठी संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये सर्वंकष धोरण जाहीर केले आहे. तदनंतर सदर शासन निर्णय अधिक्रमित करून संदर्भाधीन अधिसूचना/परिपत्रक क्रमांक ४ व ५ अन्वये सूचना निर्गमित केल्या आहेत. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील नियोजन अधिकारी (गट-ब) संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१२ ते दिनांक ०१/०१/२०१५ आणि दिनांक ०१/०१/२०१६ ते दिनांक ०१/०१/२०१८ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची अनुक्रमे संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्रमांक ६ येथील शासन परिपत्रक दि. मार्च, २०२२ अन्वये दिनांक ०१/०१/२०१२ ते दिनांक ०१/०१/२०१८ पर्यंतची ज्येष्ठतासूची तात्पुरत्या स्वरुपात अंतिम केली आहे. सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सूचनांनुसार नियोजन अधिकारी (गट-ब) पदाच्या सन २०१८ ते २०२२ या कालावधीत निवडसूचीत समाविष्ट झालेल्या अधिकाऱ्यांची नावे अंतर्भूत करून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील नियोजन अधिकारी (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१/०१/२०१९, दि.०१/०१/२०२०, दि.०१/०१/२०२१ व दि.०१/०१/२०२२ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती ज्येष्ठतासूची तयार करण्यात आली आहे. सदर ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबत जोडपत्र-अ म्हणून जोडण्यात आली आहे.

सदर ज्येष्ठतासूची मा. सर्वोच्च न्यायालय येथे प्रलंबित विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निकालाच्या अधीन राहतील.

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक सोबतच्या ज्येष्ठतासूचीत समाविष्ट असलेल्या व आपल्या विभागात कार्यरत असलेल्या, विभागातून सेवानिवृत्त झालेल्या तसेच विभागाच्या आस्थापनेवरून प्रतिनियुक्तीवर असलेल्या सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे. ज्येष्ठतासूचीत काही वास्तविक चुका अथवा त्रुटी राहिल्या असतील, तर त्याबाबत संबंधित अधिकाऱ्याने आपले निवेदन संचालनालयामार्फत सादर करावे. अधिकाऱ्यांच्या निवेदनातील वस्तुस्थिती संचालनालयाने त्या अधिकाऱ्यांचे सेवापुस्तक व अन्य उपलब्ध अभिलेख तपासून संचालकांच्या अभिप्रायासह शासनास दिनांक मार्च, २०२२ पूर्वी सादर करावे म्हणजे, त्याची पडताळणी करून ज्येष्ठतासूचीत आवश्यक ते बदल करणे शक्य होईल. त्यानंतर प्राप्त झालेल्या निवेदनांवर विचार करण्यात येणार नाही.

ज्येष्ठतासूचीमधील अधिकाऱ्यांच्या नावासमोर नमूद केलेला ज्येष्ठता दिनांक हा फक्त नियोजन अधिकारी या संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्यासाठी विचारात घेण्यात येईल. इतर कोणत्याही आर्थिक फायद्यासाठी तो दिनांक गृहीत धरला जाणार नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०३०८१७११०५२७२८ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352,
serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.03.08 17:31:30 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
२. उप सचिव (कार्यासन -१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
४. प्रशासन अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
५. नियोजन अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
६. निवड नस्ती (कार्यासन पापु-१५), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

शासन परिपत्रक क्र.आपना-२०१६/प्र.क्र.१४५/पापु-१५(१), दिनांक: ०८ मार्च, २०२२ सोबतचे “परिशिष्ट-अ”

# परिशिष्ट-अ

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “नियोजन अधिकारी (गट-ब)” संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१ जानेवारी, २०१९, दि.०१ जानेवारी, २०२०, दि.०१ जानेवारी, २०२१ व दि.०१ जानेवारी, २०२२ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची.

| | नियोजन अधिकारी संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१९ ची ज्येष्ठतासूची | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | नियम ३(२)(ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | नांव | नियोजन अधिकारी पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | नियम ३ (२)(आ)नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | नियोजन अधिकारी पदावर ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ९ | १० | ११ |
| निरंक | | | | | | | | | | |
| नियोजन अधिकारी संवर्गाची दिनांक ०१/०१/२०२० ची ज्येष्ठतासूची | | | | | | | | | | |
| अ. क्र. | नियम ३(२)(ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | नांव | नियोजन अधिकारी पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | नियम ३ (२)(आ)नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | नियोजन अधिकारी पदावर ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
| १ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | १० | ११ |
| निरंक | | | | | | | | | | |
| नियोजन अधिकारी संवर्गाची दिनांक ०१/०१/२०२१ ची ज्येष्ठतासूची | | | | | | | | | | |
| अ. क्र. | नियम ३(२)(ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | नांव | नियोजन अधिकारी पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | नियम ३ (२)(आ)नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | नियोजन अधिकारी पदावर ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
| १ | १ | ३ | | ४ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| निरंक | | | | | | | | | | |

| नियोजन अधिकारी संवर्गाची दिनांक ०१/०१/२०२२ ची ज्येष्ठतासूची | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | नियम ३(२)(ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | नांव | | प्रवर्ग | नियोजन अधिकारी पदावर नियुक्तीचा दिनांक | नियोजन अधिकारी पदावर नियुक्तीचा मार्ग | नियोजन अधिकारी पदावर ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| १ | १ | ३ | | ४ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| निरंक | | | | | | | | | | |